**महाराष्ट्र विधानमंडळाच्या सन २०२२ च्या चौथ्या हिवाळी अधिवेशनात उपस्थित आश्वासन क.१९६ अनुषंगाने समिती गठित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- विसआ-२०२३/प्र.क्र.२०५/नवि-२४**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
दिनांक :- ६ जून, २०२५.

**प्रस्तावना-**

महाराष्ट्र विधानमंडळाच्या सन २०२२ च्या चौथ्या (हिवाळी) अधिवेशनात श्री. प्रशांत बंब, मा. विधानसभा सदस्य यांनी महाराष्ट्र विधानसभा नियम १०५ नुसार औरंगाबाद महानगरपालिकेत स्थापत्य पदविका आधारे नोकरीवर रुजू होऊन शासकीय नियमांच उल्लघंन करत पदोन्नती मिळवून शहर अभियंता पर्यंत पदोन्नती मिळवणे या संबंधी लक्षवेधी सूचना उपस्थित केली होती. सदर लक्षवेधी सूचनेवर निवेदन करताना मा. मंत्री श्री. उदय सामंत यांनी खालील प्रमाणे आश्वासन दिलेले आहे:-

**“सन्माननीय सदस्यांनी केलेल्या मागणीनुसार प्रधान सचिवांच्या अध्यक्षतेखाली समिती नेमून चौकशी करण्यात येईल.”**

**०२.** सदर प्रकरणी महानगरपालिकेकडून अहवाल दि. २२.०५.२०२५ रोजी प्राप्त झाला आहे.

**०३.** मा. मंत्री महोदयांनी दिलेले सदर आश्वानाच्या अनुषंगाने या प्रकरणाची चौकशी करण्यासाठी समिती नियुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

महाराष्ट्र विधानमंडळाच्या सन २०२२ च्या चौथ्या (हिवाळी) अधिवेशनात उपस्थित आश्वासन क्रमांक १९६ च्या अनुषंगाने खालील प्रमाणे समिती गठित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकारी | पद |
|---|---|---|
| १. | प्रधान सचिव नगरविकास विभाग नवि-२ | अध्यक्ष |
| २. | आयुक्त, छत्रपती संभाजीनगर महानगरपालिका | सदस्य |
| ३. | उप सचिव (नवि-२४) | सदस्य |
| ४. | अवर सचिव (नवि-२४) | सदस्य सचिव |

०२. <u>समितीची कार्यकक्षा</u>

आश्वासन क्रमांक १९६ चे अनुषंगाने विधानमंडळाच्या कार्यवृत्तातील नगर विकास विभागाशी संबंधित मुद्दयांबाबत छत्रपती संभाजीनगर महानगरपालिकेकडील प्राप्त अहवाल व कागदपत्रांच्या आधारे चौकशी करुन शासनास अहवाल सादर करील.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०६०६११०७५८६७२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

JAYANT VASANT WANI

Digitally signed by JAYANT VASANT WANI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=ed8411d02826988b56bb8a80c92781268bc4b9d63f894022804b55bd1cea9847, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=BFF25E350EA9446CC7F3B43987F8FFE247E43E10915A7723E889FCC11E2F43EB, cn=JAYANT VASANT WANI
Date: 2025.06.06 11:08:43 +05'30'

**(जयंत वाणी)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

२. मा. उपमुख्यमंत्री महोदय (नवि) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

३. मा. राज्यमंत्री (नवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

४. प्रधान सचिव (नवि-२) यांचे वरिष्ठ स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.

५. आयुक्त, छत्रपती संभाजीनगर महानगरपालिका, छत्रपती संभाजीनगर.

६. कार्यासन नवि-२४, निवड नस्ती.